विशेष सहाय्य योजनांची विविध वृत्तपत्राद्वारे केलेल्या जाहिरातींची देयके अदा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक : विसयो -२०२०/प्र.क्र. ०३/विसयो**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई, ४०० ०३२.
दिनांक : २० जानेवारी, २०२०.

**वाचा :**

१. शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : - प्रसिध्दी -२०१९/प्र.क्र.४६/विसयो, दिनांक २२/०८/२०१९.
२. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, कार्यादेश:- क्र.आरओसी-२०१९-२०/क्र-५/ C२७३९/, दिनांक ०७/०९/२०१९.

**प्रस्तावना :**

माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांनी विविध वृत्तपत्रांना दिलेल्या कार्यादेशानुसार विशेष सहाय्य योजनेतील लाभार्थ्यांच्या अर्थसहाय्यात वाढ केल्याची जाहिरात विविध वृत्तपत्रांनी दिनांक ०९ सप्टेंबर, २०१९ रोजीच्या वृत्तपत्रामध्ये प्रसारित केली आहे. विविध वृत्तपत्रांनी जाहिरात प्रसारित केलेली रु.१९,९६,१७६/- इतक्या रकमेची देयके शासनास सादर केली असून सदरहू जाहिरातींची देयके अदा करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

विशेष सहाय्य योजनांची प्रसिध्दी व प्रसार करण्यासाठी माहिती व जनसंपर्क विभागाच्या माध्यम आराखडा नियोजन व अंमलबजावणी समितीच्या कार्योत्तर मंजूरीच्या व निधी उपलब्धतेच्या अधिन राहून रु.११,४३,४६,०००/- इतक्या माध्यम आराखडयास दि.२२ ऑगस्ट, २०१९ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय यांनी विविध वृत्तपत्रांना दिलेल्या कार्यादेशानुसार विशेष सहाय्य योजनेतील लाभार्थ्यांच्या अर्थसहाय्यात वाढ केल्याची जाहिरात विविध वृत्तपत्रांनी दिनांक ०९ सप्टेंबर, २०१९ रोजीच्या वृत्तपत्रामध्ये रु.१९,९६,१७६/- (रुपये एकोणवीस लक्ष शहाण्णव हजार एकशे शहात्तर फक्त) इतक्या रकमेची जाहिरात प्रसारित केलेल्या देयकास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे. विविध वृत्तपत्रांच्या देयकाचा तपशील पुढीलप्रमाणे :-

| अ.क्र. | वर्तमानपत्राचे नांव | देयक क्रमांक | जाहिरातीचा दिनांक | जाहिरातीची रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | रत्नागिरी टाईम्स | १३३१ | ९/९/२०१९ | ४५८६४/- |
| २ | दैनिक दिव्य मराठी | AD१९२७०४४३२१ | ९/९/२०१९ | ११९३६४/- |
| ३ | महाराष्ट्र टाईम्स | BCMH१९RV-००७३६६३ | ९/९/२०१९ | १५६४०८/- |
| ४ | लोकसत्ता | MH१०२२५८९९ | ९/९/२०१९ | ११४०७२/- |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ५ | पुढारी | MUO/DI५९७६ | ९/९/२०१९ | २९१६४८/- |
| ६ | तरुण भारत | G/Sep/२०१९/६९२ | ९/९/२०१९ | ३१७५२/- |
| ७ | प्रहार | M/A/१९-२०/०१८६८ | ९/९/२०१९ | ४८७२०/- |
| ८ | लोकशाही वार्ता | ADVT/१४५७/१९-२० | ९/९/२०१९ | ३९९८४/- |
| ९ | नवाकाळ | १९०३५५ | ९/९/२०१९ | ८३४९६/- |
| १० | गांवकरी | ००४७७/२०१९-२० | ९/९/२०१९ | ३५८६८/- |
| ११ | सकाळ | १०७२६३२ | ९/९/२०१९ | ३६२७९६/- |
| १२ | संध्याकाळ | SG१९१०१ | ९/९/२०१९ | ४४६८८/- |
| १३ | पुण्यनगरी | M/१९-०९/०१०३७ | ९/९/२०१९ | २४५७८४/- |
| १४ | मुंबई चौफेर | M/१९-०९/०१०३५ | ९/९/२०१९ | ७३५००/- |
| १५ | वार्ताहर | M/१९-०९/०१०३६ | ९/९/२०१९ | ४७६२८/- |
| १६ | आपले महानगर | MUM/१४३९/१९-२० | ९/९/२०१९ | ४८२१६/- |
| १७ | संध्यानंद | ADVT/SEP१५५/१९२० | ९/९/२०१९ | ७४६७६/- |
| १८ | देशोन्नती | EG००१६३ | ९/९/२०१९ | १३१७१२/- |
| **एकूण** | | | | **रु.१९,९६,१७६/-** |

२. हा खर्च मागणी क्रमांक "एन-३, २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण, १०४-वृध्द विकलांग व निराश्रीत व्यक्तींचे कल्याण (०८) (०८) संजय गांधी निराधार अनुदान योजना व श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्ती वेतन योजना अंमलबजावणीसाठी प्रशासकीय खर्च (२२३५ ३१२१) ५०-इतर खर्च" या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. उपरोक्त नमूद निधी अवर सचिव तथा आहरण व संवितरण अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांना बीडीएस वर वितरीत करण्यात येत आहे. या खर्चासाठी श्रीम.अश्विनी यमगर, अवर सचिव तथा आहरण व संवितरण अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांना प्राधिकृत करण्यात येत असून श्री.दि.रा. डिंगळे, सह सचिव यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

अवर सचिव (रोख शाखा) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी स्तंभ २ मध्ये नमूद १८ वृत्तपत्रांच्या स्तंभ ५ प्रमाणे देयकांचे **रुपये १९,९६,१७६/-** इतक्या रकमेचे धनादेश तयार करुन संबंधितांना त्याचे वितरण करावे.

४. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ चे वित्तीय अधिकार नियमपुस्तिका भाग-पहिला, उपविभाग-२, अनुक्रमांक ८, नियमक्रमांक-१७ (अ) नुसार प्रशासकीय विभागास दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००१२०१५०६४९४४२२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sunil Vitthal Ukirade

Digitally signed by Sunil Vitthal Ukirade
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Welfare Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f1675ab906bc1ceaccfbc91a08ebb1af88bab8226074b0ac8613e6304e94f278, serialNumber=902164c64c3fba37f940b9e5a180d28dd1440382e63e7302a5e29f41123a9b06, cn=Sunil Vitthal Ukirade
Date: 2020.01.20 15:12:48 +05'30'

( सु.वि.उकिरडे )

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३. अवर सचिव तथा आहरण व संवितरण अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. महालेखापाल, महाराष्ट्र ½,(लेखापरिक्षा/ लेखा अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
५. वित्त विभाग/ व्यय-१४, मंत्रालय, मुंबई.
६. सर्व वृत्तपत्रे.
७. निवडनस्ती.